मोटार वाहन विभागातील मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) याचे पदनाम बदलण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय क्र.एमव्हीडी १२०९/प्र.क्र.१८/परि-४,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक :- ९ जून, २००९

वाचा :- शासन निर्णय क्र.एमव्हीडी १२०३/प्र.क्र.३७५/परि-४, दि. १६ एप्रिल, २००४

***प्रस्तावाना :-*** वरील दि.१६.४.२००४ च्या शासन निर्णयान्वये मोटार वाहन विभागातील परिवहन आयुक्त कार्यालय आणि त्याअंतर्गत क्षेत्रिय आस्थापनेवरील पदांचा आढावा निश्चित करण्यात आला आहे. त्यानुसार मोटार वाहन विभागात एकूण ३४१४ पदे उपरोक्त शासन निर्णयाच्या विवरणपत्र-अ मध्ये नमूद केलेल्या तपशिलानुसार मंजूर करण्यात आली आहे. यामध्ये मोटार वाहन निरीक्षक व मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) अशा दोन संवर्गातील अनुक्रमे ३६२ व २८ पदे मंजूर करण्यात आली असून या दोन्ही पदांसाठी रु.५५००-९००० अशी वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली आहे.

२. शासन निर्णय क्र.एमव्हीडी १२०८/प्र.क्र.१७२/परि-४(२), दि.१४.११.२००८ अन्वये मोटार वाहन विभागातील क्षेत्रीय आस्थापनेवरील सर्व तांत्रिक अधिकाऱ्यांना सुधारीत वेतनश्रेणी मंजूर करण्यात आली असून शासन निर्णय क्र.एमव्हीडी १२०८/प्र.क्र.१७२/परि-४(१), दि.१४.११.२००८ अन्वये मोटार वाहन निरीक्षक या पदास राजपत्रित गट-अ (कनिष्ठस्तर) असा दर्जा देण्यात आला आहे. त्यामुळे तांत्रिक आस्थापनेतील मोटार वाहन निरीक्षक आणि लिपीक वर्गीय संवर्गातील गट-क मधील मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) या दोन पदामध्ये काही प्रमाणात भिन्नता राखणे आवश्यक झाले आहे. परंतु सदर दोन्ही पदांच्या नाम साधर्म्यामुळे जनतेच्या मनात संभ्रम निर्माण होऊन कामात संदीग्धता येण्याची शक्यता निर्माण झाली आहे. म्हणून मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) या गट-क मधील संवर्गाचे पदनाम बदलण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

***शासन निर्णय :-*** वरील वस्तुस्थितीचा सर्वकष विचार करुन गट-क आणि गट-अ (राजपत्रित) मधील मोटार वाहन निरीक्षक या समान पदनामांपैकी मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) या गट-क मधील पदाचे पदनाम त्या पदाला सोपविलेल्या जबाबदारीशी निगडीत असे असावे म्हणून आता ते

बदलून "कर वसुली अधिकारी" असे करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यामुळे आता उपरोक्त शासन निर्णयात नमूद केलेल्या मोटार वाहन निरीक्षक (कर वसुली) या पदास "कर वसुली अधिकारी" (गट-क) असे यापुढे संबोधण्यात यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र. चं. सयेकर )
शासनाचे अवर सचिव

प्रत :- महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर
मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व प्रादेशिक/उप प्रादेशिक परिवहन अधिकारी, (परिवहन आयुक्त कार्यालयामार्फत)
संचलाक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
नस्ती क्र.एमव्हीडी १२०३/प्र.क्र.३७५/परि-४
निवडनस्ती, परि४